टंचाईग्रस्त भागात सत्वर कार्यवाहीस्तव
जिल्हाधिकारी यांना त्या जिल्ह्यातील सर्व
विभागांचा प्रमुख म्हणून घोषित करणे.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय- २०१४/ प्र.क्र.२४७/म-७
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०३ डिसेंबर, २०१४

**प्रस्तावना :-**

राज्यातील पर्जन्यमानाच्या परिस्थिती नुसार त्या त्या वेळेस वा हंगामी /सुधारीत हंगामी / अंतिम पीक पैसेवारी घोषित केल्यानंतर काही भागांसाठी टंचाई सदृश्य परिस्थिती जाहीर करण्यात येत असते, टंचाई सदृश्य परिस्थितीच्या वेळी टंचाईच्या अनुषंगाने सत्वर कार्यवाही करणे आवश्यक असते. जिल्ह्यात विविध विभागाचे विभाग प्रमुख असल्याने टंचाईच्या वेळेस विविध विभागांमार्फत आवश्यक ते आदेश तातडीने काढणे शक्य होत नाही. तरी टंचाईग्रस्त भागात टंचाईच्या अनुषंगाने सत्वर कार्यवाही करून शासनाने घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी तत्परतेने करण्यासाठी तसेच त्या अनुषंगाने निर्णय घेण्यासाठी जिल्हाधिकारी यांना टंचाई सदृश्य परिस्थितीच्या वेळी त्या जिल्ह्यातील सर्व विभागांचा प्रमुख म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील पर्जन्य परिस्थिती, हंगामी / सुधारीत हंगामी / अंतिम पीक पैसेवारी या अनुषंगाने टंचाई सदृश्य परिस्थिती जाहीर केल्यानंतर टंचाईच्या अनुषंगाने सत्वर कार्यवाही करणे आवश्यक असते, तरी टंचाईग्रस्त भागात टंचाईच्या अनुषंगाने सत्वर कार्यवाही करून शासनाने घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी तत्परतेने करण्यासाठी तसेच त्या अनुषंगाने निर्णय घेण्यासाठी जिल्हाधिकारी यांना टंचाई सदृश्य परिस्थितीच्या वेळी त्या जिल्ह्यातील सर्व विभागांचा प्रमुख म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४१२०३१४४७१७२७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Ashok Rajaram Jagtap
Digitally signed by Ashok Rajaram Jagtap
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Rajaram Jagtap
Date: 2014.12.03 16:40:49 +05'30'

**( अ. रा. जगताप )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त
२) सर्व जिल्हाधिकारी
३) सर्व मुख्य अधिकारी, महसूली विभाग
४) सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद / पाटबंधारे विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग.

५) संचालक भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
६) सदस्य सचिव, महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनिस्सारण मंडळ, मुंबई
७) सर्व मुख्य अभियंता, ग्रामीण / नागरी, पाणी पुरवठा
८) प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरणे
९) आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) सर्व वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य
११) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर
१२) महालेखापाल १/२, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर
१३) मुख्य व्यवस्थापक( पत पुरवठा), बँक ऑफ महाराष्ट्र, १५०१, लोकमंगल, शिवाजीनगर, पुणे-५
१४) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, प्रादेशिक कार्यालय ,५४ वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे.
१५) सर्व मंत्रालयीन विभाग
१६) वित्त विभाग (व्यय-९)
१७) निवडनस्ती, कायार्सन म-७